अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना
अर्थसहाय्य मंजूर करण्याबाबत.
जिल्हा कोल्हापूर

# महाराष्ट्र शासन

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक - मासाका २०१०/प्र.क्र.३२१/विघयो २,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ ऑगस्ट, २०१०

0 9 नवम्बर NOV 2010

**वाचा:-** १) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.मासाका २००८/प्र.क्र.१५०/विघयो-२, दिनांक २२.५.२००८.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अंदाज २०.१०/प्र.क्र.६५/ अर्थसंकल्प ३, दिनांक ३.४.२०१०.
३) शासन ज्ञापन, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. बीजीटी-२०१०/प्र.क्र.१८० /अर्थसंकल्प, दिनांक २०.४.२०१०.
४) शासन पूरकपत्र, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.मासाका-२०१०/प्र.क्र.५२/विघयो-२, दिनांक ३१/३/२०१०.

प्रस्तावना :- अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना अर्थसहाय्य देण्याची योजना सन २००४ पासून कार्यान्वित करण्यात आली आहे. यासाठी दरवर्षी आवश्यक ती तरतूद अर्थसंकल्पात केली जाते. या योजनेचे स्वरुप खालीलप्रमाणे आहे :-

| | | (प्रकल्प मुल्याच्या) |
|---|---|---|
| १) | सहकारी संस्थेचा स्वत:चा हिस्सा | ५% |
| २) | सहकारी संस्थांना शासकीय भागभांडवल | ३५% |
| ३) | विशेष घटक योजनेमधून दिर्घ मुदतीचे कर्ज | ३५% |
| ४) | वित्तीय संस्थांकडून दिर्घ मुदतीचे कर्ज | २५% |

सदरहू योजनेच्या अनुषंगाने योजना कार्यान्वित झाल्यापासून ते आजपर्यंत शासनाकडे कोल्हापूर जिल्हयातून प्राप्त झालेल्या व प्रलंबित असलेल्या प्रस्तावांना शासकीय भागभांडवल व शासकीय कर्ज मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :- अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना अर्थसहाय्य या योजनेअंतर्गत कोल्हापूर जिल्हयातील सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मध्ये दिलेल्या ५ सहकारी संस्थांना शासकीय भागभांडवल रु.५००.०० लाख (रुपये पाचशे लाख फक्त) आणि शासकीय कर्ज रु.५००.०० लाख (रुपये पाचशे

फक्त) असे एकूण रु.१०००.०० लाख (रुपये एक हजार लाख फक्त) एवढे अर्थसहाय्य वितरीत करण्यात शासन मान्यता देत आहे.

३. संस्थेच्या पदाधिका-यांना (अध्यक्ष, सचिव) तीन दिवसांचे व्यावसायिक प्रशिक्षण यशदा, पुणे यांचेमार्फत देण्यात येईल. सदर प्रशिक्षणावर होणारा खर्च संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना संचालन व प्रशासनावरील खर्च भागविण्याकरिता देण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

४. कर्ज अथवा भाग भांडवलाची उचल केल्यानंतर त्याची व्याजासह परतफेड होईपर्यंत संपूर्ण प्रकल्प (जमीन, यंत्रसामग्री आणि प्रकल्पांची इतर मालमत्ता इत्यादि ) शासनाकडे गहाण ठेवावी, गहाण खताचा प्रचलित कायद्यानुसार करारनामा करावा, गहाणखतावर पहिला हक्क शासनाचा व दुसरा हक्क वित्तीय संस्थेचा राहील, संस्थेच्या संचालक मंडळाला थकीत कर्जासाठी वैयक्तिकरित्या जबाबदार धरण्यात येईल.

५. सदर शासकीय भाग भांडवल व दिर्घ मुदतीचे कर्ज शासनाने विहित केलेल्या अटी व शर्तीनुसार तसेच शासनाने भविष्यात आणखी काही अटी व शर्ती निश्चित केल्यास अशा अतिरिक्त अटी व शर्तीच्या अधिन राहून मंजूर करण्यात येत आहे.

६. संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपरोक्त संस्थांना शासकीय भाग भांडवल व दिर्घ मुदतीचे कर्ज वाटपाचा निधी प्रत्यक्ष अदा करण्यापूर्वी या संबंधात शासनाने विहित केलेल्या सर्व अटी व शर्तीचे पालन संबंधित संस्थांनी पूर्ण केल्याबाबतची खातरजमा करावी. तसेच या संस्थांच्या कामकाजात अथवा आर्थिक व्यवहारात अनियमितता आढळून आल्यास तशी अनियमितता नियमित झाल्याशिवाय रकमेची अदायगी करु नये.

७. उपरोक्त संस्थांच्या प्रकल्पावर, प्रकल्पानुसार पुढील यंत्रणांचे पूर्णपणे नियंत्रण राहील :-

अ) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
ब) संचालक, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
क) संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
ड) संचालक, हातमाग व वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

८. याबाबतीत संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

९. यावर होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व चालु आर्थिक वर्षाकरिता मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

शासकीय भागभांडवल रु.५००.०० लाख (रुपये पाचशे लाख फक्त)
मागणी क्रमांक एन-४
४२२५ - अनुसूचित जाती अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च
०१, अनुसूचित जातीचे कल्याण
१९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (पंचवार्षिक योजनांतर्गत योजना/ राज्य योजनांतर्गत योजना)
(०१) (०४) अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना भाग भांडवली अंशदान (४२२५ ०४५ २)
३२ अंशदाने.

दिर्घ मुदतीचे कर्ज रु.५००.०० लाख (रुपये पाचशे लाख फक्त)
मागणी क्रमांक एन-४
६२२५-अनुसूचित जाती अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांच्या कल्याणासाठी कर्ज
०१, अनुसूचित जातीचे कल्याण,
८००-इतर कर्जे, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (वि.घ.यो.),
(०१) (०२) अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना कर्जे (६२२५ ०२५ १)
५५ कर्जे व आगाऊ रकमा

१०. हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक- अंदाज २०.१०/प्र.क्र.६५/ अर्थसंकल्प ३, दिनांक ३.४.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

११. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१००८३११८५८५४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( उ. शि. लोणारे )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, हातमाग व वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेय / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.

जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, कोल्हापूर.
अध्यक्ष / सचिव, संबंधित संस्था
प्रधान सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई / उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती - विघयो २

## परिशिष्ट - अ

## अनुसुचित जातीच्या सहकारी संस्थांना अर्थसहाय्य ( सन २०१०-११)

कोल्हापूर जिल्हा

(रु.लाखांत)

| अ.क्र. | संस्थेचे नांव | प्रकल्प | एकूण प्रकल्प खर्च | मंजूर भागभांडवल | मंजूर कर्ज |
|---|---|---|---|---|---|
| १ | सावित्री मागासवर्गीय औद्योगिक सहकारी संस्था मर्या., इचलकरंजी, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर | बगॅस प्लायवूड (पार्टीकल बोर्ड) उत्पादन प्रकल्प | ६५०.०० लाख | १००.०० | १००.०० |
| २ | नवमहाराष्ट्र मागासवर्गीय कामगार यंत्रमाग औद्योगिक सहकारी संस्था मर्या.,साजणी,ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर | कापड उत्पादन प्रकल्प | ६९५.९४ लाख | १००.०० | १००.०० |
| ३ | ताराराणी महिला मागासवर्गीय यंत्रमाग सहकारी संस्था मर्या.,कबनूर, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर | कापड प्रक्रिया | ४३८.६१ लाख | १००.०० | १००.०० |
| ४ | स्नेहदीप महिला मागासवर्गीय पावरलूम को-ऑप. सोसायटी लि.,कबनूर, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर | कापड प्रक्रिया | ४३०.८७ लाख | १००.०० | १००.०० |
| ५ | मायाक्कादेवी मागासवर्गीय औद्योगिक सहकारी संस्था मर्या., इचलकरंजी, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर | स्टोन क्रेशर प्रकल्प | ६२०.०० लाख | १००.०० | १००.०० |
| | एकूण | | | ५००.०० | ५००.०० |
| | एकूण | | | १,०००.०० | |